क्र. जिपर २००९/प्र.क्र.१८० /प.रा.८,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ४ जुलै,२००९.

प्रति,

सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,
जिल्हा परिषद,

विषय :- रस्त्याच्या कामांच्या दोष निवारण कालावधी (Defect Liability Period )मधील दुरुस्ती व त्याबाबतचे सविस्तर माहिती फलक कामाच्या जागेवर बसविण्याबाबत.

संदर्भ :- १)शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.व्हीपीएम १०९९/प्र.क्र.५४/०८,दिनांक २० मे १९९९.
२)शासन परिपत्रक ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. झेडपीए २००६ /प्र.क्र.३७६/वित्त-९,दिनांक २९ जानेवारी,२००७

जिल्हा परिषदेकडील बांधकाम विभागाकडून रस्ते,पूल व इमारतीची मूळ कामे तसेच दुरुस्तीची कामे केली जातात. निविदेतील तरतुदीनुसार काम पूर्ण झाल्यानंतर कंत्राटदाराने दोष निवारण कालावधी (Defect Liability Period) मध्ये रस्त्यांची दुरुस्ती त्यांच्या खर्चाने करणे अभिप्रेत आहे.या अनुषंगाने शासनाने सार्वजनिक बांधकाम विभाग इंग्रजी पत्र क्र.सीएटी १०८७/प्र.क्र.९४/इमा-२,दिनांक १४.६.१९८९ नुसार सविस्तर सूचना दिल्या आहेत.तथापि, दोष निवारण कालावधी (Defect Liability Period) मध्ये कंत्राटदाराकडून रस्त्याच्या खराब झालेल्या भागाची दुरुस्ती होत नसल्याने रस्ते अधिक प्रमाणात नादुरुस्त होतात व त्यामुळे वाहतुकीवर विपरित परिणाम होतो असे ज्येष्ठ समाजसेवक मा.श्री.अण्णा हजारे यांनी शासनाच्या निदर्शनास आणून दिले आहे.तरी या अनुषंगाने जिल्हा परिषदे अंतर्गत सर्व कार्यकारी अभियंता यांना खालीलप्रमाणे मुख्य अभियंता यांचेमार्फत सूचना देण्यात आलेल्या आहेत.

(अ) दोष निवारण कालावधी (Defect Liability Period) हा शासनाच्या वर उल्लेख केलेल्या दिनांक १४.६.१९८९ च्या परिपत्रकानुसार निविदेमध्ये तंतोतंत नमूद करण्यात यावा व ही जबाबदारी निविदा प्रपत्रे मंजूर करण्याच्या अधिकाऱ्याची राहिल.

(ब) दोष निवारण कालावधी (Defect Liability Period) मध्ये रस्त्याची देखभाल दुरुस्ती करण्याची जबाबदारी,संबंधित कंत्राटदार काळजीपूर्वक पार पाडतो याचे संनियंत्रण (Monitoring) करण्यासाठी योग्य ती पध्दत अवलंबावी. तसेच दुरुस्तीचे काम केल्याबाबतचेही अभिलेख व्यवस्थित ठेवावे.

(क) ज्या कामाचा दोष निवारण कालावधी (Defect Liability Period) संपलेला नाही अशा प्रत्यक्ष कामांच्या जागी विहित प्रपत्रात कामाची माहिती दर्शविणारे फलक तातडीने बसवावेत.तसेच सर्वच कामांच्या संदर्भात अशाप्रकारचे माहिती फलक बसवायचे असून या माहिती फलकामध्ये कंत्राटदाराचे नांव, कार्यारंभ आदेश, कामाचा खर्च, काम पूर्ण करावयाचा दिनांक, दोष निवारण कालावधी ((Defect Liability Period)) या सर्वांचा स्पष्ट उल्लेख असणे आवश्यक राहिल.

२. ज्येष्ठ समाजसेवक श्री.अण्णा हजारे यांनी मा.मुख्यमंत्री महोदयांना लिहिलेल्या पत्रामध्ये सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत निर्गमित केलेल्या परिपत्रकाप्रमाणे कार्यवाही जिल्हा परिषद अंतर्गत रस्त्यावर होत नसल्याचे निदर्शनास आणून नाराजी व्यक्त केली आहे.

३. वरील बाबींच्या अनुषंगाने सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, यांना असे सूचित करण्यात येते की, त्यांनी हा विषय त्यांच्या मासिक बैठकीमध्ये समाविष्ट करावा व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यकारी अभियंता यांचेकडून सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दिनांक १४.६.१९८९ च्या परिपत्रकानुसार दोष निवारण कालावधी (Defect Liability Period)संदर्भात कार्यवाही होईल तसेच कामाच्या जागेवर सविस्तर माहिती फलक बसविण्याबाबत कार्यवाही होईल याबाबत दक्षता घेण्यात यावी .तसेच आपल्या अधिपत्याखालील कार्यकारी अभियंता यांचेकडून निविदेमध्ये (Defect Liability Period)चे कलमा संदर्भात सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सूचनांचे काटेकोर पालन करण्यात यावे.

४. आपणाकडील माहिती न चुकता दरमहा सचिव (ग्रा.वि.व पं.रा.) यांना सादर करावयाची आहे.ही माहिती उप आयुक्त (विकास) विभागीय आयुक्त कार्यालय यांचेमार्फत दरमहा ५ तारखेपर्यंत या विभागाकडे उपलब्ध होईल अशारितीने पाठवावी.

(दि.ग.मोरे)
उप सचिव , महाराष्ट्र शासन.

प्रतिलिपी :- सर्व उप आयुक्त (विकास),विभागीय आयुक्त कार्यालय

२ त्यांना विनंती करण्यात येते की, प्रस्तुत प्रकरणी वर नमूद केल्याप्रमाणे आपल्या महसूल विभागातील सर्व जिल्हा परिषदेकडील संबंधित माहिती एकत्रित करुन जिल्हा परिषदेकडील कामांच्या संदर्भात किती फलक लावण्यात आले आहेत या माहितीचा अंतर्भाव करुन आपला अहवाल या विभागाकडे दरमहा दिनांक १० पर्यंत पाठविण्यात यावा.

(दि.ग.मोरे)
उप सचिव , महाराष्ट्र शासन.

प्रत माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित:-

१) सर्व विभागीय आयुक्त

२) सर्व जिल्हा परिषदांचे कार्यकारी अभियंता (बांधकाम)